बेस्ट उपक्रमाला सेवा खर्च
अदा करण्यास मंजूरी देणे
(जुलै ९३ ते मार्च २००५)

महाराष्ट्र शासन
गृह विभाग,
शासन निर्णय क्रमांक: एमव्हीडी-१२०४/सीआर-२३१/परि-४.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक : ०७ ऑक्टोबर,२००४

वाचा :- १) परिवहन उप आयुक्त (लेखा),महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक.पआका/का.१८/प्रवासी कर/२००४/ ६१५१, दि.६.५.२००४

२) वित्त विभाग परिपत्रक क्र.व्ययस १०.०४/सं.क्र. ५४०/अर्थसंकल्प-२, दि. ५.६.२००४

**शासन निर्णय** :- राज्यातील वेगवेगळ्या परिवहन उपक्रमामार्फत प्रवाशाकडून मालपोषण अधिभार वसूल करुन तो शासनाकडे जमा करण्यात येतो. या माल पोषण अधिभार वसुलीपोटी परिवहन उपक्रमांना शासनाकडून २.५% सेवा खर्च स्वतंत्रपणे दिला जातो. बृहन्मुंबई विद्युत पुरवठा व परिवहन या उपक्रमास २.५% दराने सेवाखर्चापोटी रु.४,१६,३१,७१७/- (रुपये चार कोटी सोळा लाख एकतीस हजार सातशे सतरा फक्त ) इतकी रक्कम प्रदान करणे आवश्यक आहे. परंतू बेस्ट उपक्रमाने जुलै १९९३ ते नोव्हेंबर २००३ या कालावधीसाठीची सेवा शुल्कापोटीची रक्कम रु.३,४९,५७९/- परस्पर वळती करुन घेतलेली आहे. सदर वस्तुस्थिती विचारात घेता बेस्ट उपक्रमाने परस्पर वळती करुन घेतलेली रक्कम प्रथम शासनाकडे भरणा करण्याच्या अटीवर तूर्त सुमारे ५०% म्हणजे रु.२,०८,५०,०००/-(रु.दोन कोटी आठ लाख पन्नास हजार फक्त ) इतकी रक्कम बेस्ट उपक्रमाला प्रदान करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. यासाठी होणारा खर्च गृह विभाग, मागणी क्र.बी-४, "२०४५ विक्रेय वस्तु व सेवा यावरील इतर कर व शुल्क -१०४ वसुलीचा खर्च - माल व उतारू यांवरील कर- (००) (०१) परिवहन आयुक्त यांचे कार्यालय - १२ व्यावसायिक व विशेष सेवा (२०४५००१९) (योजनेतर)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो चालू सन २००४-२००५ करीता जून २००४ मध्ये नवीन बाब भाग-१ द्वारे मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.सीआर-५८३/२००४/व्यय-८, दि.१३.७.२००४ व क्र.२४१/अर्थोपाय, दि. १९.८.२००४ ला अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(स्वाक्षरी) ७/१०/०४

( रा. बा. घाडगे )
अवर सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा/ ) महाराष्ट्र-१, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
वित्त विभाग (व्यय-८), मंत्रालय, मुंबई.
गृह विभाग, (पीयुडी-१), (परिवहन-३), मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती.